**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कअप १२१४/प्र.क्र.६/१४ब**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०१ जून, २०२०

## आदेश

श्री.कै.ता.साळुंके हे सरळसेवेने सहायक कक्ष अधिकारी पदावर अ.ज. प्रवर्गामधून दिनांक १५.०४.१९९४ रोजी नियुक्त झाले आहेत. अ.ज. प्रवर्गाच्या वैधता प्रमाणपत्राअभावी श्री.साळुंके, यांना कक्ष अधिकारी पदावर पदोन्नती देण्यात आली नव्हती. श्री.साळुंके यांच्या जात प्रमाणपत्राची पडताळणी झाली असून संबंधित समितीने त्यांचे जात प्रमाणपत्र वैध ठरविले असून याबाबतचे कार्यालयीन आदेश जलसंपदा विभागाने दिनांक ०७.०१.२०२० रोजी निर्गमित केले आहेत

२. वरील बाब विचारात घेता श्री.कै.ता.साळुंके, सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग (वेतनश्रेणी स्तर एस-१४ रू.३८६००-१२२८००) यांना कक्ष अधिकारी (गट-ब) राजपत्रित (वेतनश्रेणी स्तर एस-१७ रू.४७६००-१५११००) या पदावर पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना जलसंपदा विभागात करण्यात येत आहे. सदर पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१) सद्य:स्थितीत सहायक कक्ष अधिकारी या पदाच्या ज्येष्ठता यादीबाबत कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही, तसेच या ज्येष्ठता यादीस आव्हानित देखील करण्यात आलेले नाही ही वस्तुस्थिती विचारात घेऊन सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

२) मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक ०६.०८.२०१८ रोजीच्या निर्णयानुसार सद्य:स्थितीत कक्ष अधिकारी संवर्गाच्या दिनांक ०१.०१.१९८६ पासूनच्या ज्येष्ठता याद्या सुधारित करण्याची कार्यवाही सुरू आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार ज्येष्ठता याद्या सुधारित करतांना अभावित ठरणारे अधिकारी खालच्या संवर्गात पदावनत (Push down) होऊ शकतात व त्याचा परिणाम सर्व संवर्गावर होऊ शकतो अशी संभाव्यता आहे. सदर कार्यवाहीचा प्रस्तुत कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीशी थेट संबध नसला तरी भविष्यात काही अधिकारी पदावनत होण्याची संभाव्यता विचारात घेता कायदेशीर बाबी उद्भवू नयेत तसेच अधिकची दक्षता म्हणून प्रस्तुत कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीचे आदेश हे मा.सर्वोच्च न्यायालयातील प्रलंबित विशेष अनुज्ञा याचिका क्र.२५१८१/२०१८ च्या अधीन राहतील.

३) श्री.कै.ता.साळुंके, सहायक कक्ष अधिकारी यांची कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नती ही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

४) श्री.कै.ता.साळुंके यांची कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नती ही त्यांच्या विरूध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरू झालेली नाही वा

प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे. संबंधित विभागाने याची खातरजमा करावी.

५) श्री.कै.ता.साळुंके, सहायक कक्ष अधिकारी यांना कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्याच्या अनुषंगाने स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येत आहे.

६) हे आदेश तत्काळ अंमलात येतील.

२. महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणातील तरतुदीनुसार पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण घेणे संबंधित पदोन्नत अधिका-यांवर बंधनकारक राहील अन्यथा त्यांना सहायक कक्ष अधिकारी पदावर पदावनत करण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६०११५१६११७६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ad a8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f 73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.06.01 15:20:34 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.कै.ता.साळुंके, सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१ प्रधान सचिव, जलसंपदा विभाग (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
२ सह सचिव/उप सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३ कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र./१४-अ
४ निवडनस्ती, का.क्र.१४-ब /संग्रहार्थ.